**येरवडा खुले जिल्हा कारागृह वर्ग-१ येथील मिळकत कराचे प्रलंबित देयके अदा करण्याकरीता सन २०१६-१७ या वित्तीय वर्षामध्ये रुपये २,९८,४७५/- इतक्या रक्कमेच्या प्रदानास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम १३१४/ प्र.क्र. ११९/ तुरुंग-२**
दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ जानेवारी, २०१७.

**वाचा :**

अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, पुणे यांचा प्रस्ताव इ.प्र./मिळकत कर देयक/येखुजिका/४५५०/२०१४/ कक्ष-६(२), दिनांक २२.४.२०१४व ११.४.२०१६

**शासन निर्णय :**

येरवडा खुले कारागृह यांचे कार्यालयाची पुणे महानगर पालिका पुणे यांना भरणा करावयाची मिळकत कराची देयकाची रक्कम रु. २,९८,४७५/- अनुदानाअभावी प्रलंबित होती. सदर प्रलंबित देयकांची रक्कम ही सहा वर्षापेक्षा जास्त कालावधीची असल्याने त्यास प्रशासकीय विभागाच्या मान्यतेची आवश्यकता असल्याने सदर देयके अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. पुणे महानगरपालिकेस अदा करावयाच्या देयकाबाबतचे विवरणपत्रक खालीलप्रमाणे आहे-

| अ. क्र. | देयक क्रमांक | रक्कम |
|---|---|---|
| १ | पी/१/९१/००२७०००० | २,८७,५२७/- |
| २ | पी/१/९१/००२७७१००० | १०,९४८/- |
| | | २,९८,४७५/- |

( अक्षरी रुपये दोन लाख अठ्ठयाण्णव हजार चारशे पंचाहत्तर फक्त)

३. या साठी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्र. बी-५, २०५६(००) (१०१), तुरुंग (०२), जिल्हा तुरुंग (२०५६ ००४४) दत्तमत (१४) भाडेपट्टी व कर या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या मध्ये मंजूर झालेल्या तूरतूदीतून भागविण्यात यावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उप विभाग-१, अनु. ५ नियम क्र.३९(ब) टीप-५ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार, त्यातील विहित अटी व शर्तीच्या अधीन राहुन, निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०१०९१७५५४७८२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2017.01.09 17:59:56 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
कक्ष अधिकारी, गृह विभाग.

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. अधीक्षक, येरवडा मध्यवर्ती कारागृह, येरवडा, पुणे,
४. अधिक्षक, येरवडा खुले जिल्हा कारागृह,येरवडा,पुणे,
५. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
८. कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-५,
९. कार्यासन अधिकारी, व्यय-८/विनियम, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१०.निवड नस्ती (तुरुंग-२).